राज्य प्रशिक्षण धोरण-२०११ नुसार यशदा पुणे, शिखर संस्था, तसेच विभाग व जिल्हा स्तरावर घोषित करण्यात आलेल्या प्रशिक्षण संस्थांकरिता केंद्रशासनाच्या धर्तीवर सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता ऑनलाईन प्रशिक्षण शुल्काचा दर निश्चित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: टीआरएन-२०२१/प्र.क्र.१०/२१/१२-अ,**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १९ मे,२०२२

वाचा:- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: टीआरएन -२००९/प्र.क्र.३९/१२-अ, दि.२३.०९.२०११

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: टीआरएन-२०१४/४४०/प्र.क्र.६६/ १२-अ दि.१.११.२०१४

३. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: यशदा २०१५/ १२५५/ प्र.क्र.२४३/ १२-अ, दि.३०.०४.२०१६

४. संचालक , राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा ,यशदा पुणे, यांचे राप्रनियमूयं- २०२०-२१/ साप्रवि/ प.व्य./ प्रक्र.३/१०१ दि.१५.२.२०२१ चे पत्र

५. संचालक यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यांचे पत्र क्र. राप्रनिमूयं/ २०२०-२१/साप्रवि-पव्य/प्र.क्र.०३/२०८ दिनांक ३०.०३.२०२१

६. संचालक यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यांचे पत्र क्र. राप्रनिमूयं- २०२१-२२/साप्रवि.-प.व्य./प्र.क्र.०३/९२ दिनांक ०९.०६.२०२१

७. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक टीआरएन-२०२१/२५५/प्र.क्र.१०/२१/ १२-अ, दि.६ जुलै, २०२१

८. संचालक यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यांचे पत्र क्र. राप्रनिमूयं- २०२१-२२/साप्रवि.-प.व्य./प्र.क्र.०३/२२ दिनांक २४.३.२०२२

**प्रस्तावना :-**

राज्य प्रशिक्षण धोरण २०११, संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहे. सदर प्रशिक्षण धोरणानुसार राज्यात ३ स्तरावर प्रशिक्षण संस्था घोषित करण्यात आल्या आहेत. यशदा पुणे, ही शिखर प्रशिक्षण संस्था असून ६ विभागीय स्तरावर विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्था व ३६ जिल्हयात जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था घेषित करण्यात आल्या आहेत. सदर संस्थांमधून राज्यातील सर्व वर्ग १ ते ४ च्या अधिकारी / कर्मचारी यांना निवासी व अनिवासी प्रशासकीय प्रशिक्षण देण्यात येत आहे.

सदर निवासी प्रशिक्षणाकरिता संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये यशदा पुणे, यांच्याकरिता रु.२०००/- ६ विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांकरिता रु.१५००/- व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांकरिता रु.१०००/- इतके प्रती दिन, प्रति प्रशिक्षणार्थी , प्रशिक्षण शुल्क दर निश्चित करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे या घोषित केलेल्या प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांकरिता संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये रु.६००/- इतके प्रती प्रशिक्षणार्थी, प्रति दिन, अनिवासी प्रशिक्षण शुल्क दर निश्चित करण्यात आले आहेत.

केंद्र शासनाने ( Department of Personnel and Training) DOPT दि.७.१०.२०२० च्या शासन ज्ञापनान्वये ऑन लाईन पध्दतीने प्रशिक्षण घेण्याकरिता State Level Course / District /sub District Level Course करिता रु. ११००/- इतका प्रशिक्षण शुल्क दर निश्चित केला आहे.

त्यास अनुसरून कोविड १९ ची पार्श्व भुमी विचारात घेऊन, राज्य प्रशिक्षण धोरणान्वये ऑनलाईन पध्दतीने घेण्यात येणा-या प्रशासकीय प्रशिक्षणासाठी संदर्भाधीन क्र. ७ च्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी ऑनलाइन प्रशिक्षण शुल्क दर निश्चित करण्यात आला आहे. आता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठीही ऑनलाइन प्रशिक्षण शुल्क दर निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे :-

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत, राज्यातील शिखर प्रशिक्षण संस्था, यशदा, पुणे, सहा विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थां व ३६ जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्था यांच्याकरिता ऑनलाईन पध्दतीने प्रशिक्षण घेण्यासाठी रु.७५०/- प्रति दिन प्रति प्रशिक्षणार्थी इतके एक समान प्रशिक्षण शुल्क निश्चित करण्यात येत आहे.

२. सदर प्रशिक्षण शुल्क दर हा **फक्त सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता** मंजूरकरण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२६२/२०२२ व्यय ४, दि. १०.०४.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार यशदा पुणे, सर्व विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थांकरिता लागू करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५१९१५२४१३१००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LEENA ASHISH SANKHE

Digitally signed by LEENA ASHISH SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=783CA3332598C7E1C28393EA543FA05D9FB77F36A848F4738D12288E105699F4, cn=LEENA ASHISH SANKHE
Date: 2022.05.19 15:26:23 +05'30'

**( लिना संखे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत -**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई *
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, विधान भवन, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद महाराष्ट्र, मुंबई-३२
६. विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२

८. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य महाराष्ट्र विधानमंडळ,सचिवालय, विधानभवन, मुंबई
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
१०. सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, मंत्रालयीन विभाग
११. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई. *
१२. सर्व विभागीय आयुक्त
१३. महासंचालक, यशदा, बाणेर रोड, पुणे-४११ ००७
१४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-१, मुंबई
१५. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र-२, नागपूर
१६. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-१, मुंबई
१७. महालेखापाल, लेखा परीक्षा,महाराष्ट्र-२, नागपूर
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९. उपमहासंचालक / संचालक राज्य प्रशिक्षण नियोजन व मूल्यमापन यंत्रणा, यशदा पुणे
२०. सर्व संचालक / विशेष कार्य अधिकारी / प्राचार्य विभागीय व जिल्हा प्रशासकीय प्रशिक्षण संस्थां,
२१. सर्व मंत्रालयीन विभाग,
२२. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई / औरंगाबाद / नागपूर *.
२३. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई / औरंगाबाद / नागपूर. *
२४. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोकआयुक्त कार्यालय, मुंबई. *
२५. मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई ( ५ प्रती)
२६. मा. अपर मुख्य सचिव, ( सेवा ) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२७. निवड नस्ती-१२-अ, साप्रवि, मंत्रालय, मुंबई-३२

* पत्राने